रत्नागिरी विमानतळासाठी अतिरिक्त
जमीन संपादन करण्यासाठी नोडल
एजन्सी नियुक्त करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण (बैठक)-१२१७/प्र.क्र.१४६/ २८-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ३२.
दि. २५ जुलै, २०१७.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या Regional Connectivity Scheme अंतर्गत पहिल्या टप्प्यात रत्नागिरी विमानतळाचा समावेश करण्यात आलेला आहे. सदरहू विमानतळ भारतीय तटरक्षक दलाच्या ताब्यात आहे. सदर विमानतळाची सद्यस्थितीतील धावपट्टी १३७२ मी. (४५०० फूट) लांबीची आहे. तथापि, Regional Connectivity Scheme योजनेअंतर्गत रत्नागिरी विमानतळ Bombardier/ ATR ७२ प्रकारची विमाने वाहतुकीसाठी व इतर अनुषंगिक सेवा पुरविण्यास सक्षम व्हावा, याद्दष्टीने सदर धावपट्टीची लांबी वाढवून ती २१३५ मी. (७००० फूट) करण्याची मागणी भारतीय तटरक्षक दलाने केली आहे. याखेरीज, रत्नागिरी विमानतळावरुन सुरक्षित नागरी विमान वाहतूक व्हावी याद्दष्टीने आवश्यक त्या सुविधा (Parallel Taxi Track, Isolation Bay, Dispersal & other allied facilities) निर्माण व्हाव्या यासाठी सद्यस्थितीत कार्यरत असलेल्या धावपट्टीच्या पश्चिमेस मिरजोळे गावातील सुमारे २५ हेक्टर जमीन राज्य शासनाने विनामूल्य उपलब्ध करुन द्यावी, अशी भारतीय तटरक्षक दलाने मागणी केली आहे. याबाबतचा प्रस्तावही त्यांनी जिल्हाधिकारी कार्यालय, रत्नागिरी यांचेकडे सादर केलेला आहे.

भारतीय तटरक्षक दल व जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांनी याप्रकरणी अतिरिक्त जमीन संपादन करण्यासाठी राज्य शासनाकडून तातडीने नोडल एजन्सी नेमण्यात यावी, अशी विनंती केली आहे. त्याप्रमाणे, रत्नागिरी विमानतळासाठी लागणारी अतिरिक्त जमीन संपादन करण्यासाठी नोडल एजन्सी नेमण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :**

भारतीय तटरक्षक दल व जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांनी विनंती केल्याप्रमाणे रत्नागिरी विमानतळासाठी अतिरिक्त जमीन संपादन करण्यासाठी "महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित" यांना नोडल एजन्सी म्हणून नेमण्यात येत आहे. तसेच, सदर अतिरिक्त जमीन संपादनासाठी जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१७०७२५१२५२००५८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Shubhangi Suhas Agashe

Digitally signed by Shubhangi Suhas Agashe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=172255ef061cede931f38d47a523ff38ab66ea8d7033b5f7ebcf3045a75b6735, cn=Shubhangi Suhas Agashe
Date: 2017.07.25 12:59:21 +05'30'

**( शु.सु.आगाशे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (मा.मुख्यमंत्री कार्यालय), मंत्रालय, मुंबई
२. महालेखापाल, ( लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई.
४. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, रत्नागिरी
५. अपर महानिदेशक, तटरक्षक कमांडर (पश्चिमी समुद्रतट), रत्नागिरी विमानतळ, रत्नागिरी
६. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या.२५), मंत्रालय, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. निवड नस्ती.